महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई
यांना भाडेरक्कम वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक:- भाडेक २०२३/प्र.क्र.१७/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट, २०२४.

वाचा :- १. विभागाचे समक्रमांकाचे दि.१५.०३.२०२४ व दि.२८.०३.२०२४ रोजीचा शासन निर्णय.
२. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई यांचे दि.१५.०५.२०२४ रोजीचे पत्र.

**शासन ज्ञापन :-** महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई यांना सन २०२३-२४ करीता भाडेकरारापोटी द्यावयाची एकुण रक्कम रु.२३,६५,७३,०६३/- एवढी होती. त्यानुसार संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये **रु.१६,४७,९९,०००/-** एवढा निधी वितरीत करण्यात आला असून, भाडेपोटी उर्वरित एकूण रु.७,१७,७४,०६३/- निधी वितरीत करणे शिल्लक होते. त्यानुसार महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उर्वरित भाडेरक्कम रु.७,१७,७४,०६३/- (सात कोटी सतरा लक्ष चौऱ्याहत्तर हजार त्रेसष्ट फक्त) खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

अटी व शर्ती :-

(१) महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ अधिनियम २०१४ नुसार शासनाकडून मंजूर झालेले अनुदान हे विद्यापीठ निधीत जमा करुन अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर अनुदानातून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही विद्यापीठाने करावी.

(२) कुलगुरु, महाराष्ट्र राष्टीय विधी विद्यापीठ, मुंबई यांना शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, हे अनुदान त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आले आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

(३) वरील सर्व अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांनी सदर कामाकरिता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरिता विधी विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

(४) विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजूर केलेले आहे त्याच उद्दिष्टासाठी मंजूर केलेल्या अनुदानाचा वापर करावा.

(५) यासंदर्भात वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी व अटीचे ततोतंत पालन करावे. तसेच शासनाच्या प्रचलित नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन कार्यवाही करण्यात यावी.

(६) विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे मार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

२. सदरहू मंजूर झालेली तरतूद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई यांना तातडीने सुपूर्द करण्याची कार्यवाही संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

३. उक्त प्रयोजनार्थ येणारा खर्च "मागणी क्र.- डब्ल्यू-२, प्रधानशीर्ष-२२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२-विद्यापीठांना सहाय्य, -(००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३ दि.२५.०७.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाने (अनौपचारिक संदर्भ क्र.८६०/२०२४/व्यय-५, दि.०९.०८.२०२४ अन्वये) मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०८२३१४४८५८३५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=be7c6620763057633615219 44ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.08.23 15:04:36 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.कुलपती, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई.

६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र, नागपूर
८. उप सचिव (विशि) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई.
१०.संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.अवर सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण), मुंबई.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५.निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.